2005101814062400१

तात्काळ/कालमर्यादा

**मुख्यमंत्री सहायता निधी**

दक्षिण भारताच्या किनारपट्टीवरील आपदग्रस्तांच्या मदतीसाठी
शासकीय/निमशासकीय अधिकारी व कर्मचारी यांच्याकडून देणग्या.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : सीएसएफ-१००४/प्र.क्र.८७/०४/१६-अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ६ जानेवारी,२००५.

## परिपत्रक

इंडोनेशियाच्या सुमात्रा बेटांजवळ दि.२६.१२.२००४ रोजी झालेल्या भूकंपामुळे समुद्रात निर्माण झालेल्या सुनामी लाटांच्या तडाख्यामुळे भारताच्या दक्षिणेकडील तमिळनाडू, आंध्रप्रदेश, पाँडेचरी व केरळ या राज्यात तसेच अंदमान व निकोबार या बेटांवर मोठया प्रमाणात जिवित व वित्त हानी झाली आहे. राज्य शासनाने नैसर्गिक आपत्तीच्या या दूर्धर प्रसंगी आपदग्रस्तांना मुख्यमंत्री सहायता निधीमधून सहाय्य करण्याचा व या अनुषंगाने राज्य शासकीय अधिकारी व कर्मचारी यांच्या मासिक वेतनातून एक दिवसाच्या वेतनाइतकी रक्कम कापून ती मुख्यमंत्री सहायता निधीत जमा करण्याचा निर्णय घेतला आहे.

२. या अनुषंगाने पुढील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

अ) राज्य शासनातील सर्व अधिकारी व कर्मचारी यांच्या जानेवारी,२००५ च्या फेब्रुवारी,२००५ मध्ये देय होणाऱ्या, जर हे शक्य नसेल तर त्यानंतर लगतच्या महिन्याच्या, वेतनातून प्रत्येकी एक दिवसाचे वेतन (महागाई व अन्य भत्त्यांसहीत) परस्पर कापून घेण्यात यावे. कापून घ्यावयाची रक्कम निर्धारित करण्यासाठी ३१ दिवसांचा महिना समजण्यात यावा, कापून घ्यावयाची निर्धारित रक्कम पूर्ण रुपयात असावी.

आ) या वसूलीसाठी संमतीपत्रे मागविण्याची आवश्यकता नाही.

३. या संदर्भात खालील प्रमाणे कार्यपद्धती अवलंबिण्यात यावी :-

अ) वेतन बील संपूर्ण रक्कमेचे काढण्यात यावे. वेतन वितरणाच्या वेळी वरील प्रमाणे कापून घेतलेल्या रकमेची नोंद एका स्वतंत्र नोंदवहीत घेण्यात यावी. शासकीय अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन वाटप करतानाच त्यांच्याकडून कापून घ्यावयाच्या वेतनाइतक्या रकमांच्या पावत्या तयार ठेवण्यात याव्यात. त्यात मुख्यमंत्री सहायता निधी, (दक्षिण भारत - भूकंप) यासाठी संबंधित देणगी आली आहे असे स्पष्ट करावे.या पावत्या संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी आपल्या स्वाक्षरीने संबंधितांना द्याव्यात. ही पावती सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद केल्याप्रमाणे आयकर सवलतीसाठी पात्र राहील. त्यामुळे मुख्यमंत्री सहायता निधीतून परत वेगळ्या व्यक्तीगत पावतीची व प्रमाणपत्राची आवश्यकता राहणार नाही. वेतन वाटप करीत असतानाच पावत्या देण्यात याव्यात. धनादेशाद्वारे मिळणाऱ्या रकमांची देखील अशाच तऱ्हेने नोंद घेण्यात यावी.

वरील प्रमाणे कापून घेतलेल्या रकमेचा स्टेट बँक ऑफ इंडिया, बॅकबे रेक्लमेशन शाखा, मुंबई-२१ ब्रँच क्र.१५९३ वर देय असलेला "मुख्यमंत्री सहायता निधी, (दक्षिण भारत -भूकंप )" या नावे धनाकर्ष काढण्यात यावा व तो आपल्या जिल्ह्याच्या जिल्हाधिकारी कार्यालयात संबंधित अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यात यावा. जिल्हाधिकारी कार्यालयातून सदर धनाकर्ष प्राप्त झाल्याबाबतची मुख्यमंत्री सहायता निधीची पावती देण्यात यावी. सर्व जिल्हाधिकारी यांनी पावत्या देण्यासाठी मुख्यमंत्री सहायता निधीची पावती पुस्तके मुख्यमंत्री सहायता निधी/निधी कक्ष, रुम नं.६०९ ब, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ येथून दूताकरवी उपलब्ध करून घ्यावीत.

ब) बृहन्मुंबईतील, मंत्रालयीन विभाग, विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख इत्यादींनी जमा केलेल्या निधीचा वरील परिच्छेद ३(अ) मध्ये नमूद केल्याप्रमाणे धनाकर्ष काढून तो मुख्यमंत्री सहायता निधी/निधी कक्ष, रुम नं.६०९ ब, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ यांच्याकडे पत्रासोबत सूपुर्द करून मुख्यमंत्री सहायता निधीकक्षाकडून पावती घेण्यात यावी. निधी कक्षामध्ये शासकीय कार्यालयांनी त्यांच्या अधिकारी व कर्मचारी यांचेकडून देणगी स्वरुपात वेतनातून कापून घेतलेली रक्कम रोखीने स्वीकारली जाणार नाही, याची नोंद घ्यावी.

क) जिल्हाधिकारी यांनी त्यांच्याकडे प्राप्त झालेले धनादेश / धनाकर्ष संपूर्ण तपशिलासह (देणगीदारांचे नांव, बँकेचे नाव, धनाकर्ष / धनादेश क्रमांक, दिनांक, रक्कम, पावती पुस्तक क्रमांक, पावती क्रमांक) उपसंचालक (निधी व लेखा) मुख्यमंत्री सचिवालय, निधी कक्ष, रुम नं.६०९ ब, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ यांचेकडे जसजसे प्राप्त होतील तस तसे पाठवावेत.

रोखीने प्राप्त झालेल्या निधीच्या बाबतीत अशा निधीचा भरणा जिल्हा स्तरावरील जिल्हाधिकारी यांच्याकडील मुख्यमंत्री निधीच्या स्टेट बँकेकडील बचत खात्यात करण्यास हरकत नाही. मात्र त्याचा हिशोब वेगळा ठेवावा. जिल्हाधिकाऱ्यांनी विभाग/कार्यालय निहाय यादी तयार करुन एकूण निधीचा स्टेट बँक ऑफ इंडियाचा धनाकर्ष (डिमांड ड्राफ्ट) मुख्यमंत्री सहाय्यता निधी कक्षाकडे तातडीने तपशीलासह पाठवावा.

४. वरील आदेशानुसार मुख्यमंत्र्यांच्या सहाय्यता निधीकरीता जिल्हा परिषदा, मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विविध निमशासकीय संस्था, महामंडळे, अंगीकृत उपक्रम, अनुदान प्राप्त शैक्षणिक संस्था, कृषी व अकृषी विद्यापीठे, महानगरपालिका, नगरपालिका, नगरपरिषदा, विद्यापीठे इत्यादी संस्थांतील अधिकारी व कर्मचारी यांच्याकडून देखील देणग्या जमा करण्यात याव्यात.

५. मुख्यमंत्र्यांच्या कार्यालयाने परिच्छेद ३(ब) मध्ये उल्लेख केल्याप्रमाणे देणग्या स्वीकारुन संबंधितांना एकत्रित पोच पावती देण्याची व्यवस्था करावी.

६. उपरोक्त प्रमाणे मुख्यमंत्री सहाय्यता निधीस प्राप्त होणाऱ्या रकमेचा विनियोग दक्षिण भारताच्या किनारपट्टीवरील आपदग्रस्तांच्या मदतीसाठी शासनाच्या मान्यतेने करण्यात येईल.

७. सदर परिपत्रक वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१०७३/व्यय-४, दि.२९.१२.२००४ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( दे.त्र्यं.कुमावत )
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव,
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
४. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
*६. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* ७. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
*८. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* ९. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
*१०.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* ११.सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
*१२. सचिव, राज्य निवडणूक आयोग,मुंबई,
१३.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
१४.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर,
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६.निवासी व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१७.सर्व विभागीय आयुक्त,
१८.सर्व महानगरपालिका यांचे आयुक्त,
१९.सर्व जिल्हाधिकारी/ जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२०.सर्व नगरपरिषदा / नगरपालिका यांचे मुख्य अधिकारी,
२१.राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे सर्व व्यवस्थापकीय संचालक,
२२.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई (प्रसिद्धीपत्रक काढण्याच्या विनंतीसह)
२३.मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
२४.वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय, मुंबई,
२५.मंत्रालयातील सर्व विभाग,
२६.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२७.निवड नस्ती.

*पत्राने

## परिशिष्ट - अ

## प्रमाणपत्राचा नमुना

प्रमाणित करण्यात येते की, श्री./श्रीमती/कुमारी

जे/जी कार्यालयात पदावर कार्यरत आहेत, त्यांनी दक्षिण भारताच्या किनारपट्टीवरील आपदग्रस्तांना मदत म्हणून मुख्यमंत्री सहायता निधी, (दक्षिण भारत - भूकंप) या सार्वजनिक न्यासाला (Public Trust) रुपये /- (अक्षरी रुपये ) एवढी देणगी दिली असून ही देणगी आयकर अधिनियम, १९६१ च्या कलम ८० (ग) (२) (तीन एच् एफ्) अन्वये १००% आयकर सुटीस पात्र आहे.

दिनांक :

आहरण व संवितरण अधिकारी
यांची सही व शिक्का

एच–826 –1अ.